**महाराष्ट्र-कर्नाटक सीमा प्रश्न "समन्वयक मंत्री"**
**(Nodal Minister) नियुक्त करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : मकसी-११२५/प्र.क्र.०५/का.सीमाप्र(३६)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा** :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक : मकसी १११५/मुमंस-२७/ प्र.क्र.१०३/२०१५/३६, दिनांक : १५ डिसेंबर, २०१५.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक : मकसी-१११९/प्र.क्र.५६/३६, दिनांक : १३ जानेवारी, २०२०.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासननिर्णय,क्रमांक : मकसी-११२२/प्र.क्र.३३/३६, दिनांक : २२ नोव्हेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र - कर्नाटक सीमाप्रश्नासंदर्भात महाराष्ट्र शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दावा क्र.४/२००४ (Original Suit) दाखल केला आहे. सीमाप्रश्नी प्रभावी पाठपुरावा करुन विषयाला चालना मिळण्यासाठी, मा.सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित दाव्यात नियुक्त वरिष्ठ वकील व सीमा भागातील मध्यवर्ती महाराष्ट्र एकिकरण समिती समवेत समन्वय साधणे, तसेच वादातीत सीमाभागातील मराठी भाषिक जनतेचे विविध प्रश्न सोडविणे, याकरीता वाचा येथील शासन निर्णयान्वये वेळोवेळी "समन्वयक मंत्री" यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे.

राज्यातील विधानसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ नंतर नव्याने शासन अस्तित्वात आल्याने, सीमा प्रश्नासंदर्भात "समन्वयक मंत्री" नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र - कर्नाटक सीमा प्रश्नासंदर्भात महाराष्ट्र शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या दाव्याचा प्रभावी पाठपुरावा करून विषयाला चालना देणे, मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल दाव्यात शासनाची बाजू मांडण्यासाठी नियुक्त केलेले विधिज्ञ/ वरिष्ठ वकील आणि सीमा भागातील मध्यवर्ती महाराष्ट्र एकीकरण समिती यांच्यात समन्वय साधणे. तसेच, वादग्रस्त सीमा भागातील मराठी भाषिक जनतेचे विविध प्रश्न सोडविणे याकरिता, वाचा क्र.३ येथील शासन निर्णयान्वये श्री.चंद्रकांत (दादा) बच्चू पाटील, मा.मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण, वस्त्रोद्योग व संसदीय कार्य) आणि श्री.शंभूराज शिवाजीराव देसाई, मा.मंत्री (राज्य उत्पादन शुल्क) या दोन तत्कालीन मंत्र्यांची महाराष्ट्र - कर्नाटक सीमाप्रश्नासाठी "समन्वयक मंत्री (Nodal Minister)" म्हणून नियुक्ती करण्यात आली होती.

आता, या शासन निर्णयाद्वारे पुन:श्च श्री.चंद्रकांत (दादा) सरस्वती बच्चू पाटील, मा.मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण, संसदीय कार्य) आणि श्री.शंभूराज विजयादेवी शिवाजीराव देसाई, मा.मंत्री (पर्यटन, खनिकर्म,

माजी सैनिक कल्याण) या दोन विद्यमान मंत्र्यांची महाराष्ट्र - कर्नाटक सीमा प्रश्नासाठी **"समन्वयक मंत्री (Nodal Minister)"** म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२८१५२३२७३६०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA
GOPALKRISHNA
GAIKWAD

Digitally signed by RAJENDRA GOPALKRISHNA GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e18e8c2154c8ecbcf0edc1fcc5b3e74c50aa53537f32c40ea2c1af9814e56681, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=021D4BA37C61940F8B373F5BEB2D6BCA43B8F4858CE3ADE3FD42291B9038E881, cn=RAJENDRA GOPALKRISHNA GAIKWAD
Date: 2025.02.28 15:25:13 +05'30'

**( रा. गो. गायकवाड )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-४०००३२.
३. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव,, विधानभवन, मुंबई-४०००३२.
४. मा.उप सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव,, विधानभवन, मुंबई-४०००३२.
५. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-४०००३२.
६. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. मा.उपमुख्यमंत्री, नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकामे (सार्वजनिक उपक्रम) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
८. मा.उपमुख्यमंत्री, वित्त व नियोजन,राज्य उत्पादन शुल्क, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. मा.मंत्री, पर्यटन, खनीकर्म, माजी सैनिक कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११. सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई-४०००३२.
१३. सर्व मा.संसद/ विधान परिषद / विधान सभा सदस्य, विधानभवन, मुंबई- मुंबई-४०००३२.
१४. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई (पत्रान्वये).
१५. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१६. अपर मुख्य सचिव (प्र.ना.उ.सु.) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१७. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१८. सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली-११००००
१९. उप सचिव (सीमाप्र) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२०. जिल्हाधिकारी, मुंबई/कोल्हापूर/ रत्नागिरी/ पुणे.
२१. श्री.शिवाजी जाधव, ॲडव्होकेट ऑन रेकॉर्ड, आदित्य व्हीला, ए-८०, सेक्टर-१४, नॉयडा-२०१३०१.
२२. अध्यक्ष, मध्यवर्ती महाराष्ट्र एकिकरण समिती, बेळगाव, कर्नाटक राज्य (पत्रान्वये).
२३. निवडनस्ती (कार्यासन-सीमाप्र/३६).